**समता शिक्षण प्रसारक मंडळ, लातूर संचालित मिलिंद कनिष्ठ महाविद्यालय, शाहू चौक, लातूर या शाळेचे,उच्च माध्यमिकचे वर्ग औसा रोड, लातूर येथे स्थलांतर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः माशास्थ ३३२२/प्र.क्र.४६६/२२/एसएम-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १० एप्रिल, २०२३

वाचा :

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक : माशास्थ ३३२१/प्र.क्र.४०१/एसएम-१ दिनांक २८ जुलै, २०२१.**

संदर्भ :- **१) विभागीय शिक्षण उपसंचालक, लातूर विभाग, लातूर यांचे जा.क्र./शिउसला/कमवि-४/एमडीपी/१४३३०/३२/२०१५-१६, दि.०८.०९.२०१५**
**२) विभागीय शिक्षण उपसंचालक, लातूर विभाग, लातूर यांचे जा.क्र. विशिउसं/ला/कार्या ०५/केएसटी/२०२२-२३/६८६२, दिनांक ०४.११.२०२२**

**प्रस्तावना :-**

समता शिक्षण प्रसारक मंडळ, लातूर संचालित मिलिंद कनिष्ठ महाविद्यालय, शाहू चौक, लातूर या मराठी माध्यमाच्या अनुदानित कनिष्ठ महाविद्यालयाचे वर्ग (इयत्ता ११ वी व १२ वी विज्ञान व संयुक्त कला, वाणिज्य शाखा), औसा रोड लातूर येथील स्थलांतरास मान्यता देण्याचा संदर्भाधीन पत्रांन्वये प्राप्त झालेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त शाळा-कनिष्ठ महाविद्यालयाच्या इमारतीमध्ये भौतिक सुविधा अपु-या असल्याने संस्थेने कनिष्ठ महाविद्यालयाचे वर्ग औसा रोड, जि. लातूर येथे स्थलांतरीत केले आहेत. त्यामुळे सदर शाळेतील कनिष्ठ महाविद्यालयाच्या वर्गांच्या उपरोक्त ठिकाणच्या स्थलांतरास करण्यास खालील अटी व शर्तीवर कार्योत्तर मान्यता देण्यात येत आहे.:-

(१) स्थलांतरीत शाळेची किमान पटसंख्येची अट कोणत्याही कारणास्तव शिथिल केली जाणार नाही. तसेच सर्व विद्यार्थ्यांना स्थलांतराच्या ठिकाणी सामावून घेणे आवश्यक राहील.

(२) सदर शाळा मुळ ठिकाणी अनुदानाच्या ज्या तत्वावर कार्यरत होती, त्याच तत्वावर स्थलांतरीत ठिकाणी कार्यरत राहील.

(३) शासनाकडून शाळा, शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी, वेतन/वेतनेतर अनुदान, विद्यार्थी इ.संदर्भात वेळोवेळी विहित करण्यात येणारे अधिनियम, नियम, आदेश इ.चे पालन संस्थेने करणे आवश्यक राहील.

(४) शाळेच्या बाबतीत मुळ शासन परवानगीच्या व मान्यतेच्या कोणत्याही अटी व शर्तींमध्ये बदल होणार नाहीत.

(५) उपरोक्त वर्ग स्थलांतरीत करण्यात आलेनंतरही प्रशासकीय कामकाज मूळ शाळेतूनच चालेल,तसेच स्वतंत्र मुख्याध्यापकाची मागणी संस्थेस करता येणार नाही.

(६) भविष्यात शासन मान्यतेशिवाय शाळेचे स्थलांतर करण्यात येणार नाही, याबाबत संस्थेने दक्षता घ्यावी.

(७) सदर स्थलांतरासंदर्भात शासनाकडे अथवा शिक्षण विभागाच्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांकडे कोणत्याही प्रकारच्या तक्रारी वा आक्षेप आल्यास किंवा स्थलांतरासंदर्भातील अटींचा भंग झाल्याचे निदर्शनास आल्यास स्थलांतर रद्द करण्याचे अधिकार शासनास राहतील.

२. विभागीय शिक्षण उपसंचालक, लातूर विभाग, लातूर यांनी सदर शाळेच्या स्थलांतराबाबत पुढील कार्यवाही १५ दिवसांत करावी व केलेल्या कार्यवाहीबाबत शासनास अवगत करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०४१०१९३९४८०३२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAVIN RAJARAM MUNDHE

Digitally signed by PRAVIN RAJARAM MUNDHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=8cc298cb2ba38f035e6bd1a51789c7ed1ed4f4fce865eda3495969f77d97c89a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DC78036626EC580D66C0AC502D43AF5F670B5BA13F51213AD071ACD53714A284, cn=PRAVIN RAJARAM MUNDHE
Date: 2023.04.10 19:44:41 +05'30'

**( प्रविण मुंढे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. शिक्षण संचालक (माध्यमिक/उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
२. विभागीय शिक्षण उपसंचालक, लातूर विभाग, लातूर.
३. शिक्षणाधिकारी,(माध्यमिक) जिल्हा परिषद, लातूर.
४. अध्यक्ष/ सचिव, समता शिक्षण प्रसारक मंडळ, लातूर
५. निवडनस्ती (एसएम-१).